ओवळे-भाईंदरपाडा खारभूमी योजना ता.जि.ठाणे या योजनेच्या नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो २०१६/(२९५/२०१६)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि:- १९/०६/२०१७

**पहावे :-** मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र २०१६/खारभूमी/ ओवळे-भाईंदरपाडा / तां-२/४०५१, दि.२१/०९/२०१६

**प्रस्तावना:-**

ओवळे-भाईंदरपाडा खारभूमी योजना ता. जि.ठाणे, ही खारभूमी, योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी ७३५ मी. आहे. सदर योजना उल्हास खाडीच्या तिरावर आहे. हया योजनेचा बांध कमकुवत असल्याने व उघाडया नादुरुस्त असल्याने शेतक-यांचे नुकसान होत असल्यामुळे ही योजना होणे गरजेचे आहे. त्याकरिता योजना तातडीने हाती घेण्याबाबत ग्राम पंचायत, लाभधारक व लोकप्रतिनिधी यांच्याकडून मागणी करण्यात आल्याने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला ओवळे-भाईंदरपाडा खारभूमी योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

ओवळे-भाईंदरपाडा खारभूमी योजना ता. जि.ठाणे या योजनेस विभागाच्या सन २०११-१२ व सा.बां.वि. दरसूची २०१५-१६ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रू.५५,४८,१५४/- (रुपये पंच्चावन्न लक्ष, अठ्ठेचाळीस हजार, एकशे च्योपन्न फक्त) एवढया रकमेस याव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रु.५०,४३,८०४ (रु.पन्नास लक्ष,त्रेचाळीस हजार,आठशे चार फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रु. ५,०४,३८०/- (रु.पाच लक्ष, चार हजार तीनशे ऐंशी फक्त) उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दिनांक १७.४.२०१५ "अन्वये" प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव सचिव तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९७/का.१४३४, दि. १८.०४.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. जलसंपदा विभाग,शासन निर्णय दिनांक २२.६.२०१५ मधील अनु. क्र.२ व ३ नुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पून:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रु. ५००/- प्रती हेक्टरखर्च (किमान रु. २००/- रोख व रु. ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने) घेण्यात यावे. योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरीत करणे आवश्यक राहील.

५. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

६. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (१५८/२०१७) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१९१५०५५९८३२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2017.06.19 15:05:07 +05'30'

**सहपत्र:**- परिशिष्ट अ

**( रा. बा. क्षीरसागर )**
अवर सचिव

**प्रतिलीपी :-**

१. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
४. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
६. मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
११. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई
१४. संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२
१५. जिल्हाधिकारी,ठाणे
१६. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

जलसंपदा विभाग/खारभूमी

परिशिष्ट-अ

**शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१६/(२९५/२०१६)/ खारभूमी दिनांक १९/०६/२०१७ चे सहपत्र ओवळे-भाईंदरपाडा खारभूमी योजना ता. जि.ठाणे या अंदाजपत्रकाचा गोषवारा.**

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण किंमत रु. |
|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक | १०,३८०.०० |
| २ | बी-भूसंपादन | ०.०० |
| ३ | सी- माती काम | १७,१०,७७४.०० |
| ४ | एफ( आर.एच.टी. वर्क्स ) | ३३,२२,७१०.०० |
| ५ | के( इमारती) | ०.०० |
| ६ | एम-( वृक्षारोपण) | ०.०० |
| ७ | ओ-(संकीर्ण) | ०.०० |
| ८ | पी-(देखभाल) | ०.०० |
| ९ | आर ( दळणवळण) | ०.०० |
| | एकूण | ५०,४३,८०४.०० |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | ५,०४,३८०.०० |
| | एकूण | ५५,४८,१५४.०० |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ८१ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | रु. ६८,९८१/- |
| लाभव्यय गुणोत्तर | ३.६० |

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2017.06.19 15:06:08 +05'30'

( रा.बा. क्षीरसागर )
अवर सचिव